शासन सेवेत पुन:स्थापना व पदस्थापना
श्री.साळुबा ल. वेताळ,
उप अधिक्षक भूमि अभिलेख.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्रमांक:- पुनस्था-०२२४/प्र.क्र.७४/ई-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
दिनांक : २७ जून, २०२४

**वाचा:-**

१.जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (म.राज्य), पुणे यांचे आदेश, क्र. क्र.आस्था/ एस.आर.६८४८/आ-२/२०२३,दि.१५.०२.२०२३
२.महसूल व वन विभाग, शासन आदेश, क्र. विभाचौ-०६२३/प्र.क्र.२८४/ई-६,दि.२७.०९.२०२३
३.महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र.निप्रआ-२०१५/प्र.क्र.१०५/ई-४,दि.०८.०५.२०१५
४.सामान्य प्रशासन विभाग,शासन परिपत्रक,क्र.निप्रआ-१११२/प्र.क्र.८२/११-अ,दि.२०.०४.२०१३

**शासन आदेश:-**

श्री.साळुबा ल. वेताळ, तत्का. उप अधिक्षक भूमि अभिलेख, गंगापूर, जि.छत्रपती संभाजीनगर (निलंबित) यांना लाचेचा सापळा प्रकरणी लाचलुचपत प्रतिबंधक विभागाने दाखल केलेल्या गुन्ह्याच्या अनुषंगाने वाचा क्र.१ येथील आदेशान्वये दि.०७.०२.२०२३ रोजी शासन सेवेतून निलंबित केले आहे. तसेच वाचा क्र.२ येथील आदेशान्वये श्री.वेताळ यांच्याविरुद्ध विभागीय चौकशीची कार्यवाही सुरु करण्यात आली आहे.

२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.३१.०१.२०१५ मधील तरतुदींच्या अनुषंगाने महसूल व वन विभाग, शासन निर्णय, दि.८.५.२०१५ (वाचा क्र.३) अन्वये गठीत करण्यात आलेल्या निलंबन आढावा समितीने श्री.वेताळ यांना शासन सेवेत पुन:स्थापित करण्याची शिफारस केली आहे. त्यानुसार श्री.वेताळ यांच्याविरुद्धच्या विभागीय चौकशी व लाचलुचपत प्रतिबंधक विभागाच्या गुन्ह्याच्या अनुषंगाने न्यायालयीन प्रकरण उद्भवल्यास त्यातील निर्णयाच्या अधीन राहून त्यांना शासन सेवेत पुन:स्थापित करण्यात येत आहे.

३. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक, दि.२०.०४.२०१३ (वाचा क्र.४) मधील तरतुदीन्वये श्री.साळुबा ल. वेताळ, उप अधिक्षक भूमि अभिलेख यांची पुन:स्थापनेनंतर खालील तक्त्यातील रकाना क्र.३ येथे नमूद पदावर पदस्थापना करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व पदनाम | पदस्थापनेचे पद/ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.साळुबा ल. वेताळ, उप अधिक्षक भूमि अभिलेख. | उप अधीक्षक भूमि अभिलेख, सिंदखेड राजा, जि.बुलढाणा | रिक्त पदी |

४. श्री.वेताळ यांनी पदस्थापनेच्या पदावर तात्काळ रुजू व्हावे तसेच त्यांना रुजू होण्यासाठी जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (म.रा.), पुणे यांनी आवश्यक ती कार्यवाही त्वरीत करावी व त्यांचा पदस्थापनेच्या पदावरील रुजू अहवाल शासनास सादर करावा.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२४०६२७१३०६५७६५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

SANJAY SHANKARRAO INGLE

Digitally signed by SANJAY SHANKARRAO INGLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=f0d616600e4d2f510d1c8cc19813e070ad282d2275bf6fc132a2dee97f14e0a6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D337930B14433DC62C0154AF2BBC60BB5A6EDCAA66B7F34596C50A27EB0F6333, cn=SANJAY SHANKARRAO INGLE
Date: 2024.06.27 13:18:39 +05'30'

**( संजय इंगळे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:**

१. जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (म.रा.), पुणे.
२. श्री.साळुबा ल. वेताळ, तत्का. उप अधिक्षक भूमि अभिलेख, गंगापूर, जि.छत्रपती संभाजीनगर.
(जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (म.रा.), पुणे यांच्यामार्फत)

**प्रत:-**

१) मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२.
२) अप्पर मुख्य सचिव (महसूल), तथा अध्यक्ष, निलंबन आढावा समिती, महसूल व वन विभाग मंत्रालय, मुंबई-३२.
३) अतिरिक्त महासंचालक, लाचलूचपत प्रतिबंधक विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई तथा सदस्य निलंबन आढावा समिती
४) सह/उप सचिव (गृह विभाग) तथा सदस्य, निलंबन आढावा समिती
५) सह/उप सचिव (महसूल विभाग-ई४अ) तथा सदस्य, निलंबन आढावा समिती
६) उप संचालक भूमि अभिलेख, अमरावती प्रदेश, अमरावती.
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
८) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
९) कार्यासन ई-६ संग्रहार्थ.